उच्च शिक्षण संचालनालय, पुणे या कार्यालयासाठी जुन्या निर्लेखित वाहनाच्या बदली नवीन वाहन खरेदी करण्यास मंजूरी देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : वाहन-२०१९/प्र.क्र.७७/१९/मशि-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार इमारत, मुंबई-४०००३२.
**दिनांक : २५ फेब्रुवारी, २०२२.**

संदर्भ : १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.-प्रशामा-२०१२/(४४/१२)/मशि-३, दि.०१/०१/२०१६.
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-वाहन-२०१७/प्र.क्र.४१/१७/विनियम,दि.२८/०७/२०२०.
३) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. उशिसं-२०१९-२०/ शावाख/ प्रशा-३/७५०९, दि. ०३/०६/२०१९.

**प्रस्तावना :**

संचालक, उच्च शिक्षण, पुणे व अधिनस्त क्षेत्रीय कार्यालयांना एकूण १४ शासकीय वाहनांची अनुज्ञेयता संदर्भाधीन दिनांक ०१/०१/२०१६ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आली आहे. संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांनी संदर्भाधीन दिनांक ०३/०६/२०१९ च्या पत्रान्वये उच्च शिक्षण संचालनालय, पुणे या कार्यालयाच्या निर्लेखित वाहनाच्या बदली नवीन वाहन खरेदीस मंजूरी देण्यासाठी सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

संचालक,उच्च शिक्षण,महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अधिनस्त, पुढीलप्रमाणे नमूद केलेले उच्च शिक्षण संचालनालय, पुणे या कार्यालयासाठी त्यांच्या पूर्वीच्या जुन्या निर्लेखित वाहनाच्या बदली नवीन वाहन खरेदी करण्यास व तदप्रित्यर्थ येणाऱ्या रु.८,००,०००/- ( अक्षरी रुपये आठ लक्ष फक्त) इतक्या खर्चास खालील अटींच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.-

| अ.क्र. | विभाग/जिल्हा | वाहन वापरणाऱ्या कार्यालयाचे नाव | निर्लेखित वाहनाचा क्रमांक |
|---|---|---|---|
| १ | पुणे | उच्च शिक्षण संचालनालय, पुणे | एमएच-१२-पी-८८१० |

**अटी :-**

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक वाहन-२०१७/प्र.क्र.४१/१७/विनियम, दिनांक २८/०७/२०२० च्या शासन निर्णयामधील तरतुदीनुसार, वरील तक्त्यात नमूद उच्च शिक्षण संचालनालय,पुणे या कार्यालयासाठी रु.८,००,०००/- (रुपये आठ लक्ष फक्त ) या मर्यादेत ( वाहनाची किंमत + वस्तू व सेवा कर + टेम्परारी रजिस्ट्रेशन चार्जेस + सहाय्यभूत साहित्य (Accessories) इत्यादी अंतर्भूत करुन ) वाहन खरेदी करण्यात यावी.

२) शासन निर्णय, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि.०१/१२/२०१६ व क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दि. २४/०८/२०१७ च्या शासन निर्णयानुसार वाहन खरेदी GeM Portal वरुन विहित पध्दतीचा अवलंब करुन करण्यात यावी.

३) उच्च शिक्षण संचालनालय, पुणे या कार्यालयासाठी नवीन वाहन खरेदी करण्याची कार्यवाही संचालक,उच्च शिक्षण, पुणे यांच्या स्तरावर करण्यात यावी.

४) सदर खरेदी करतांना त्या संबंधीच्या नेहमीच्या कार्यपध्दती विषयी नियमांचे आणि इतर सर्व निदेशांचे काटेकोर पालन करण्याची जबाबदारी तसेच यामध्ये कोणत्याही प्रकारची अनियमितता आढळल्यास त्याची जबाबदारी संचालक, उच्च शिक्षण यांची राहील.

५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.वाहन-२०१३/प्र.क्र.४६/१३/विनियम, दिनांक ०३/१०/२०१७ मधील सूचनांनुसार वाहन आढाव्या अन्वये संचालक, उच्च शिक्षण, पुणे व त्यांच्या अधिनस्त कार्यालयाकरीता अनुज्ञेय ठरविण्यात आलेल्या सर्व १४ वाहनांची माहिती महावाहन संगणक प्रणालीवर नोंदविण्यात यावी.

६) नवीन वाहन खरेदीनंतर जुन्या वाहनाची नोंद महावाहन प्रणालीवरुन नष्ट करुन नवीन वाहनाची नोंदणी त्या ठिकाणी करण्यात यावी.

२. यासाठी होणारा खर्च "मागणी क्र.डब्ल्यु-२,२२०२ सर्वसाधारण शिक्षण ८० सर्वसाधारण ००१ संचालन व प्रशासन, (००)(०२) उच्च शिक्षण संचालनालयाचे बळकटीकरण करणे (अनिवार्य) (२२०२ २६५९) ५१, मोटार वाहने या लेखाशिर्षाखालील सन २०२१-२२ मधील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३७/२२/विनियम, दिनांक ०१/०२/२०२२ व अनौपचारीक संदर्भ क्रमांक ५१/२०२२/व्यय-५, दिनांक १७/०१/२०२२ अन्वये त्या विभागाने दिलेल्या संमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०२२५१६०९५८३२०८ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Hemantkumar Pandharinath Baviskar

Digitally signed by Hemantkumar Pandharinath Baviskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=71de9bdf8c28541d92a5cd36d722315bab7f006ec5420633722d42e0976d82a8, cn=Hemantkumar Pandharinath Baviskar
Date: 2022.02.25 16:12:01 +05'30'

**( हे.पं.बाविस्कर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) महालेखापाल लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर.
३) महालेखापाल लेखापरीक्षा, महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
५) कक्ष अधिकारी (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६) निवड नस्ती ( मशि-३), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.